टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस (TISS) सोबत करण्यात आलेल्या सामंजस्य करार (MOU) नुसार प्रकल्प अंमलबजावणी व संनियंत्रण समिती (Project Implementation and Monitoring Committee) चे गठन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. जेएलएम-०४२१/प्र.क्र.६५/तुरुंग-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १० मार्च, २०२२

वाचा:- १) गृह विभाग, शासन निर्णय क्र.जेएलएम-१२१२/प्र.क्र.५४/पुनर्बांधणी क्र.५९/तुरुंग-२, दिनांक ०५/०५/२०१६
२) राज्य शासन व टाटा इन्स्टिट्युट ऑफ सोशल सायन्सेस यांच्यामध्ये दिनांक २८/१२/२०२१ रोजी झालेला सामंजस्य करार

**प्रस्तावना:-**

कारागृहातील बंद्यांचे कल्याण व पुनर्वसन करण्याच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याकरीता राज्य शासन व टाटा इन्स्टिट्युट ऑफ सोशल सायन्सेस (TISS) यांच्यामध्ये दिनांक २८/१२/२०२१ रोजी सामंजस्य करार (M.O.U.) करण्यात आला आहे. सदर करारासोबत जोडलेल्या जोडपत्र-१ मधील A नुसार प्रकल्प अंमलबजावणी व संनियंत्रण समितीचे गठन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कारागृहातील बंद्यांचे कल्याण व पुनर्वसन करण्याच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याकरीता राज्य शासन व टाटा इन्स्टिट्युट ऑफ सोशल सायन्सेस (TISS) यांच्यामध्ये सामंजस्य करार (M.O.U.) दिनांक २८/१२/२०२१ रोजी करण्यात आला आहे. सदर सामंजस्य करारासोबतच्या जोडपत्र-१ मधील A नुसार प्रकल्प अंमलबजावणी व संनियंत्रण समितीचे (Project Implementation and Monitoring Committee) खालीलप्रमाणे गठन करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे | : | अध्यक्ष |
| २) विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई | : | सदस्य |
| ३) कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, येरवडा, पुणे | : | सदस्य |
| ४) कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद | : | सदस्य |
| ५) कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर | : | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ६) सह सचिव/ उपसचिव (तुरुंग), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई | : | सदस्य |
| ७) डॉ.विजय राघवन, संचालक, प्रयास, टाटा इन्सिटट्युट ऑफ सोशल सायन्सेस, मुंबई | : | सदस्य |
| ८) श्रीमती कल्पना कटारे, प्रयास, टाटा इन्स्टिट्युट ऑफ सोशल सायन्सेस, मुंबई | : | सदस्य |

२. सदर बैठकीच्यावेळी शासनाकडून सल्लागार सेवा घेण्याचे ठरल्यास, सल्लागार संस्थेचा प्रतिनिधी आवश्यकतेनुसार बैठकीस उपस्थित राहील.

३. **समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-**

प्रकल्प अंमलबजावणीची सविस्तर व सर्वसमावेशक योजना (Project Implementation Plan-PIP) तयार करुन योजनेचा त्रैमासिक आढावा घेणे व कार्यक्रमाची प्रगती, त्यात येणाऱ्या अडचणी याबाबत देवाणघेवाण करणे याकरीता आवश्यक उपाययोजना करण्यासाठी सदर समितीचे गठन करण्यात येत आहे.

**समितीच्या जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे आहेत:-**

१) पथदर्शी प्रकल्पाचे दैनंदिन कामकाज सुलभरित्या राबविण्यात येत आहे, याबाबत खात्री करणे.
२) शासनाच्या इतर विभागांबरोबर तसेच बाह्य संस्थांबरोबर आवश्यक तेथे सहयोग करार करणे.
३) प्रकल्प राबविताना वित्तीय, विधी आणि नैतिक मुल्यांची पूर्तता होत आहे, याबाबत खात्री करणे.
४) संबंधित क्षेत्रातील प्रकल्प संघाला (Project Team) नियमित बैठकांबाबतची सूचना देणे.
५) समितीने द्विवार्षिक आधारावर तिचा प्रगती अहवाल समितीच्या अध्यक्षांना सादर करणे आवश्यक राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३१०१६०५३६४०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIRUDDHA V JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA V JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, pseudonym=A29ED764E36FC94AB89468332737553 3A01AD102,
serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA V JEWLIKAR
Date: 2022.03.10 17:55:38 +05'30'

**( अनिरुध्द जेवळीकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विशेष पोलीस महानिरीक्षक (कारागृह), दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई
३) कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, येरवडा, पुणे
४) कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद
५) कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर

६) उपसचिव (तुरुंग), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७) डॉ.विजय राघवन, संचालक, प्रयास, टाटा इन्सिटट्युट ऑफ सोशल सायन्सेस, मुंबई
८) श्रीमती कल्पना कटारे, प्रयास, टाटा इन्स्टिटट्युट ऑफ सोशल सायन्सेस, मुंबई
९) मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) मा.राज्यमंत्री (गृह-शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११) मा.राज्यमंत्री (गृह-ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) अपर मुख्य सचिव (अ.व सु.) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) अवर सचिव (तुरुंग-१/तुरुंग-३), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवडनस्ती, तुरुंग-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.